महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती (महानिर्मिती) कंपनीस वाटप होणाऱ्या कोळसा खाणींचा विकास करण्यासाठीच्या प्रस्तावास व इतर अनुषंगिक बाबींसाठी मंजुरी व निर्देश देण्यासाठी उच्चस्तरीय समिती गठीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : समिती-२०१८/प्र.क्र.२५८/ऊर्जा-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई -४०००३२

दिनांक : २७ जून, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती (महानिर्मिती) कंपनीच्या औष्णिक वीज केंद्रांना यापूर्वी केंद्र शासनाच्या कोल इंडिया लि. व त्याच्या उपकंपन्या WCL, SCCL इ. कंपन्यांकडून मागणीनुसार कोळशाचा पुरवठा करण्यात येत होता. परंतु तद्नंतर केंद्र शासनाच्या विद्युत अधिनियम,२००३ मधील तरतुदीच्या अनुषंगाने खाजगी कंपन्या वीजनिर्मिती क्षेत्रात उतरल्या व सदर कंपन्यांच्या औष्णिक विद्युत केंद्रांना कोळशाची गरज असल्याने कोळसा खाणींच्या वाटपाच्या धोरणामध्ये केंद्र शासनाने बदल केला. सदर धोरणाच्या संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाने दि.२५ ऑगस्ट, २०१४ रोजी दिलेल्या निर्णयास अनुसरून केंद्र शासनाने कोळसा खाण (विशेष तरतूद) अधिनियम,२०१५ (२०१५ चा ११ वा) हा अधिनियम प्रसृत केला. सदर अधिनियमातील तरतुदीनुसार आता कोळसा खाणींचे वाटप खाजगीसह सर्व शासकीय विद्युत निर्मिती कंपन्यांना केंद्रीय कोळसा मंत्रालयाकडून करण्यात येते. त्यामुळे राज्याच्या वीजनिर्मिती कंपन्यांवर त्यांना वाटप झालेल्या कोळसा खाणींचा विकास करून त्यातून कोळसा प्राप्त करून घेण्याची जबाबदारी पडली आहे.

महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती (महानिर्मिती) कंपनीस वाटप झालेल्या कोळसा खाणींचा, खाण व खनिजे (विकास व विनियम) अधिनियम, १९५७ मधील तरतुदीनुसार तसेच केंद्रीय कोळसा मंत्रालयाने दि.२२ एप्रिल, २०१५ व दि.५ ऑगस्ट,२०१५ रोजी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कोळसा खाणींचा विकास करणे आवश्यक आहे. त्याकरिता महानिर्मिती कंपनीकडून प्राप्त होणाऱ्या अशा प्रस्तावाबाबत शासन स्तरावर विचारविनिमय करून, यासंबंधी उचित निर्णय घेण्यासाठी, एका समितीची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती (महानिर्मिती) कंपनीस केंद्र शासनाच्या कोळसा मंत्रालयाकडून वाटप होणाऱ्या कोळसा खाणींचा विकास करण्यासाठी खाण विकासक व चालक (Mine Developer & Operator) यांची नियुक्ती करण्याकरिता अशा प्रस्तावांची सखोल छाननी होऊन गुणवत्तापूर्वक उचित निर्णय घेण्यासाठी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे **"उच्चस्तरीय समिती"** नियुक्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव (उद्योग) | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव (विधी व न्याय) | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव (ऊर्जा) | सदस्य- सचिव |
| ७ | अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी | निमंत्रित सदस्य |

सदर समितीच्या बैठकीस मा.अध्यक्ष अन्य संबंधित विभागांच्या सचिवांना/अधिकाऱ्यांना उपस्थित राहण्यासाठी आमंत्रित करू शकतील.

वरील उच्चस्तरीय समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील :-

१) महानिर्मिती कंपनीस कोळसा मंत्रालयाकडून वाटप करण्यात येणाऱ्या कोळसा खाणींच्या विकासासाठीच्या प्रस्तावास मंजुरी देणे.

२) इतर अनुषंगिक बाबींवर निर्देश देणे.

४. वरीलप्रमाणे प्रस्तावित समितीची नियुक्ती झाल्यानंतर अशा प्रकारच्या प्रस्तावाबाबत अंतिम निर्णय घेण्याचे अधिकार सदर समितीस असतील.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२८१३०२०८४९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2018.06.28 13:12:46 +05'30'

**(भि. य. मंता)**
शासनाचे उप सचिव

**प्रती,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव
४) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई

६) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

७) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

८) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

९) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

११) मा.राज्यमंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव

१२) सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, १३ वा मजला, वर्ल्ड ट्रेड सेंटर क्र. १, कफ परेड, कुलाबा, मुंबई- ४०० ००५

१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ४०००२०

१४) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई ४०००२०

१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर

१६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर

१७) अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई- ४०० ०५१

१८) सर्व मंत्रालयीन विभाग.

१९) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज मंडळ सुत्रधारी कं. ३ रा मजला, हाँगकाँग बिल्डींग, हुतात्मा चौक, मुंबई- ४०० ०२३

२०) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी मर्या. प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई- ४०० ०५१

२१) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्या. प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई- ४०० ०५१

२२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज पारेषण कंपनी मर्या., प्रकाशगंगा, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई- ४०० ०५१

२३) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक

२४) ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने

२५) निवड नस्ती (ऊर्जा-४)